अपंग व्यक्ती(समान संधी,हक्कांचे संरक्षण व संपूर्ण सहभाग) अधिनियम १९९५ ची अंमलबजावणी करणेबाबत

**महाराष्ट्र शासन**
समाजकल्याण,सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग
शासन निर्णय क्र.इडीडी-२०००/८६४/प्र.क्र.२१३/सुधार-२
मंत्रालय विस्तार भवन,मुंबई-४०००३२.
दिनांक :१४नोव्हेंबर,२०००

वाचा :- जिल्हा समाजकल्याण अधिकारी,चेंबूर,बृहन्मुंबई यांचे क्र.जिसकअ/मुं/अवि/अपंग जिल्हा स्तरिय समिती/२०००-२००१/३५२९, दि.४.१०.२००० चे पत्र

<u>शासन निर्णय :</u> अपंग व्यक्ती(समान संधी,हक्कांचे संरक्षण व संपूर्ण सहभाग) अधिनियम १९९५ अंमलात आलेला असून सदर कायद्यांतर्गत अपंग कल्याणार्थ अनेक योजना अभिप्रेत आहेत, किंबहुना शासनाने यापूर्वीच दिलेल्या आदेशांची अंमलबजावणी योग्य प्रकारे झाल्यास अपंगांच्या अनेक समस्या सुटू शकतील. उदा.या कायद्याच्या कलम ३३ नुसार अपंगांना ३ टक्के आरक्षण कायदेशीररित्या बंधनकारक करण्यात आलेले आहे. तथापि, महाराष्ट्र शासनाने यापूर्वीपासूनच म्हणजे सन १९७८ पासून ३ टक्के आरक्षण अपंग व्यक्तीकरिता ठेवले होते. तथापि, याची प्रभावीपणे अंमलबजावणी न झाल्यामुळे अपंग व्यक्तींना शासकीय सेवेत योग्य ते प्रतिनिधीत्व लाभलेले नाही. त्याचप्रमाणे अपंग व्यक्तीकरिता अनेक योजना अस्तित्वात असून देखील त्याचा योग्य तो लाभ त्यांना मिळत नाही.

२. उपरोक्त स्थितीत अपंग व्यक्तीचे कल्याण व पुनर्वसन गांव पातळीवर होण्याच्या दृष्टीने केंद्र शासनाने जिल्हा स्तरिय समिती नेमण्याबाबत आदेश दिलेले आहेत. त्यानुसार मुंबई महानगरपालिकेचे अतिरिक्त आयुक्त यांचे अध्यक्षतेखाली मुंबईमध्ये पुढीलप्रमाणे समितीची रचना करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे:-

| | |
|---|---|
| १) मुंबई महानगरपालिकाचे आयुक्त | -अध्यक्ष पदसिध्द |
| २) जिल्हाधिकारी | - उपाध्यक्ष पदसिध्द |
| ३) जिल्हा समाजकल्याण अधिकारी | - सचिव पदसिध्द |
| ४) (अ) जिल्हा शल्य चिकित्सक (अधिक्षक,जे.जे.हॉस्पिटल,मुंबई) | - सदस्य |
| (ब) जिल्हा शिक्षण अधिकारी | - सदस्य |
| (क) मुंबई जिल्हा नागरी विकास यंत्रणेचे मुख्य अधिकारी | - सदस्य |
| (ड) जिल्हा रोजगार विनिमय केंद्र अधिकारी | - सदस्य |
| ५) स्वयंसेवी अशासकीय अपंग संस्थांचे ५ प्रतिनिधी (प्रत्येक अपंग प्रवर्गातील उदा.अंध,अस्थिव्यंग, मूकबधीर,मतिमंद इ.) | - सदस्य |

६) महानगरपालिकेमधील आरोग्य अधिकारी - सदस्य
७) महानगरपालिका/नगरपालिका यांचा प्रतिनिधी - सदस्य

टीप-- क्र.५ येथील अशासकीय सदस्यांची नियुक्ती जिल्हयाचे पालकमंत्री करतील व ७ येथील सदस्यांची नांवे जिल्हा कार्यकारी समिती अध्यक्ष नामनिर्देशाद्वारे ठरवतील. त्याचप्रमाणे आवश्यकतेनुसार अशासकीय/शासकीय संस्थेतील प्रतिनिधींना कोणत्याही बैठकीला बोलावण्याचे अधिकार जिल्हा कार्यकारी समिती अध्यक्ष यांना असतील.

३. **समितीची कार्यकक्षा:-** अपंग व्यक्ती(समान संधी,हक्कांचे संरक्षण व संपूर्ण सहभाग) अधिनियम १९९५ च्या कायद्याची अंमलबजावणी करणे, अपंग व्यक्तीच्या कल्याणार्थ योजनांची प्रभावीपणे अंमलबजावणी व संनियंत्रण करणे, याबाबतचा अहवाल आयुक्त,अपंग कल्याण,महाराष्ट्र राज्य यांना तसेच सचिव,समाजकल्याण विभाग यांना सादर करणे इ.

४. **समितीची बैठक:-** समितीची बैठक किमान ३ महिन्यातून एकदा घेण्यात यावी.

५. सदर समितीची स्थापना करण्याबाबतची योग्य ती कार्यवाही संबंधित जिल्हाधिका-यांमार्फत करण्यात येईल. सदर समितीच्या अशासकीय सदस्यांना कोणत्याही प्रकारचे भत्ते लागू होणार नाहीत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

(प्र.सं.इंदुलकर)
अवर सचिव,महाराष्ट्र शासन

प्रति,
आयुक्त,महानगरपालिका,मुंबई
जिल्हाधिकारी,मुंबई
आयुक्त,समाजकल्याण संचालनालय,महाराष्ट्र राज्य,मुंबई
विभागीय समाजकल्याण अधिकारी,मुंबई
जिल्हा समाजकल्याण अधिकारी,बृहन्मुंबई
जिल्हा शल्यचिकित्सक,अधिक्षक,जे,जे,हॉस्पिटल,मुंबई
जिल्हा शिक्षणाधिकारी,मुंबई
मुख्य अधिकारी,जिल्हा नागरी विकास यंत्रणा(डा),मुंबई
जिल्हा रोजगार विनिमय,केंद्र अधिकारी
आरोग्य अधिकारी,महानगरपालिका,मुंबई